महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाची स्थापना- आकस्मिकता निधीतून घेतलेल्या अग्रिमानुसार उपलब्ध झालेले अनुदान नियंत्रण अधिका-याकडे सुपूर्द करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक:-मप्रन्या-१०८९/सीआर-२८/१६[अ],
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक:- १८ जुलै १९८९.

शासन निर्णय:-

शासकीय/ निमशासकीय कर्मचा-यांच्या सेवाविषयक तक्रारींचा विचार करून त्यावर निर्णय घेण्यासाठी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण स्थापन करण्याच्या शासनाच्या निर्णयानुसार नवी मुंबई येथे न्यायाधिकरणाचे कार्य सुरू करावयाचे आहे त्यासाठी पदाधिकारी, अधिकारी व कर्मचारी यांची पदे निर्माण करणे तसेच इतर खर्चाच्या पूर्ततेसाठी पुढील अधिवेशनापर्यंत [म्हणजे जुलै ते नोव्हेंबर १९८९ हया काळात] कराव्या लागणा-या खर्चाकरिता शासन ज्ञापन, वित्त विभाग, क्रमांक आकनि-११८९/५१/अर्थसंकल्प-१३, दिनांक १५ जुलै १९८९ अन्वये रुपये १५,९६,०००/- [रुपये पंधरा लक्ष शहाण्णव हजार फक्त] इतका अग्रिम आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आला आहे. न्यायाधिकरणाचे अधिकारी अद्याप नियुक्त झालेले नाहीत. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-मप्रन्या-१०८५/के. नं. ८६/१६[अ], दिनांक ८/५/८६ नुसार संबंधित महसूल आयुक्तांना न्यायाधिकरणासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून नेमण्यात आले आहे. त्याप्रमाणे, वर दर्शविलेल्या अग्रिमानुसार उपलब्ध झालेले अनुदान रुपये १५,९६,०००/- [रुपये पंधरा लक्ष शहाण्णव हजार फक्त] महसूल आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणासाठी उपलब्ध झालेल्या अग्रिमातून होणारा खर्च "मागणी क्रमांक ए-९-२०७०-इतर प्रशासकीय सेवा [१०४][२] महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण" हया लेखाशीर्षाखाली दाखविण्यात यावा. हया अग्रिमाची प्रतिपूर्ती विधीमंडळाच्या आगामी अधिवेशनामध्ये सामान्य प्रशासन विभागामार्फत पूरक मागणी सादर करून करण्यात येईल.

३. नियंत्रक अधिका-यांनी आकस्मिकता निधीमधील अग्रिमाबाबत महाराष्ट्र बजेट मॅन्युअल १९७७ [खंड १] च्या परिच्छेद १९१ मध्ये नमूद केलेली कार्यपध्दती अवलंबावी. त्याचप्रमाणे त्यांनी आकस्मिकता निधीतील अग्रिमातून प्रत्यक्ष खर्च केलेल्या मासिक खर्चाची एकत्रित माहिती त्या महिन्याच्या नंतरच्या १५ तारखेपर्यंत सामान्य प्रशासन विभाग तसेच वित्त विभाग यांच्याकडे पाठवावे. हया अग्रिमातून

विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र राज्य १ मुंबई,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र राज्य २ नागपूर,
महालेखापाल [लेखा परीक्षा] महाराष्ट्र राज्य १ मुंबई,
महालेखापाल [लेखा परीक्षा] महाराष्ट्र राज्य २ नागपूर,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे,
विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई,
जिल्हाधिकारी ठाणे,
वित्त विभाग [कार्यासन क्र. अर्थसंकल्प-३ , अर्थसंकल्प-१३ व व्यय-४]
सामान्य प्रशासन विभाग [ कार्यासन क्रमांक २५ , २६ व १९ ]
महासंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष
नवीन प्रशासन भवन ५ वा मजला [ २ प्रती ].